**स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि.०२.०१.२०१६ रोजी प्रसिद्ध केलेल्या अंतिम ज्येष्ठता सूचीत सुधारणा..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन शुद्धीपत्र क्रमांक - ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,**
**दिनांक - १२ फेब्रुवारी, २०१९**

वाचा-१) शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.०२.०१.२०१६.
२) शासन शुद्धीपत्र क्र. सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/ प्र.क्र.५८/ आस्था-१, दि.१५.०७.२०१७.

**प्रस्तावना -**

संदर्भाधीन १ येथील शासन परिपत्रक दि.०२.०१.२०१६ अन्वये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१४ या कालावधीतील अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर परिपत्रकान्वये ज्येष्ठता सूचीमध्ये नाव समाविष्ट करणेबाबत नियमाधीन निकष स्पष्ट करण्यात आले आहेत. तद्नंतर सदर ज्येष्ठता सूचीच्या अनुषंगाने प्राप्त आक्षेप / निवेदने यांचे अवलोकन करुन दि.१५.०७.२०१७ रोजी शासन शुद्धीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

२. तथापि, सदर जेष्ठतासूचीबाबत अद्यापही आक्षेप / प्रतिवेदने प्राप्त होत आहेत. सदर जेष्ठता सूचीमध्ये श्री. सुदाम केरबा उकंडे यांची जेष्ठता अ. क्र. २५२५ वर निश्चित करण्यात आलेली आहे. श्री. उकंडे यांना स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गातील समावेशनाचा दिनांक १९.६.२०१० असा दर्शविण्यात आलेला आहे. श्री. उकंडे यांनी सर्वश्री संतोष दामले, अजय सातपुते, संजय बगाटे इ.उमेदवारांबरोबर परिक्षा दिलेली आहे. या परिक्षेतील पात्र उमेदवारांना माहे सप्टेंबर, २००८ च्या आदेशानुसार नियुक्ती देण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर उमेदवार विहीत कालावधीत रूजू झालेले आहेत. मात्र श्री. उकंडे यांना मा.न्यायालयाच्या आदेशानुसार सेवेत घेण्यात आले असून ते दि. १९.६.२०१० रोजी रूजू झालेले आहेत. सेवाजेष्ठता यादीत दि.१९.६.२०१० हाच त्यांचा समावेशनाचा दिनांक दर्शविण्यात आलेला आहे. यामध्ये श्री. उकंडे यांच्या ज्येष्ठतेचा मानीव दिनांकात सुधारणा करणे आवश्यक आहे. तसेच श्री. उकंडे यांचा जन्म दिनांक ०८.०७.१९६९ असून जेष्ठता यादीत तो दि.०७.८.१९६९ दर्शविण्यात आलेला आहे.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड यांचे आदेश जा.क्र. सेवा-१/६२/२०१५, दि.०५.०२.२०१५ नुसार त्यांना दि. ०८.०७.२०१४ पासून कनिष्ठ अभियंता अर्हता परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात आलेली आहे. या बाबी विचारात घेता श्री.उकंडे यांचे जन्मतारीख, निम्न पदावरील नियुक्तीचा दिनांक, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गात नियुक्ती दिनांक तसेच जेष्ठतेचा मानीव दिनांक यामध्ये दुरूस्ती करणे आवश्यक आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे शुध्दीपत्र निर्गमित करण्यात येत आहे :-

**शुध्दीपत्र :-**

श्री. सुदाम केरबा उकंडे, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांना शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.ज्येष्ठता २०१५/प्र.क्र.५८/आस्था-१, दि.०२.०१.२०१६ च्या

जेष्ठतासूचीत दर्शविण्यात आलेली अ. क्र. २५२५ येथील जेष्ठता वगळण्यात येत आहे. श्री. सुदाम केरबा उकंडे, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, यांची सेवाजेष्ठता पुढीलप्रमाणे पुन:निश्चित करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | जन्मतारीख | जात प्रवर्ग | शैक्षणिक अर्हता | स्था. अ. स. संवर्गात ज्या पदावरून आले ते पद | नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मानीव दिनांक | आस्थापनेचा प्रकार | स्था. अ. स. पदाची अर्हताकारी परिक्षा उतीर्ण/सूट | सध्याचे मंडळ कार्यालय | जेष्ठतचा मानीव दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २५२०अ | श्री. सुदाम केरबा उकंडे | ०८.७.१९६९ | अ.जा. | डी.सी.ई. | सरळसेवा | १९.६.२०१० | ०९.९.२००८ | नियमित | सूट (०८.७.२०१४) | नांदेड | ८.७.२०१४ | |

३. सदर शुध्दीपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सेवा-३ कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२१२१२४०५१९६१८ असा आहे. सदरहू आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68e604684d5ae3908b43f3994a5d621ae70aea823677742131dbe7e69348f436, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2019.02.12 12:48:38 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य
२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड, महाराष्ट्र राज्य
त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहू शासन शुद्धीपत्र श्री.सुदाम केरबा उकंडे , स्थापत्य
३. अभियांत्रिकी सहायक यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावे.
४. कक्ष अधिकारी, आस्था-३, सेवा-३ व संगणक कक्ष, सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती.